**दिवगंत नेते, रा.सु.गवई, यांचे अमरावती येथील स्मारकाच्या विकास आराखड्यास प्रशासकीय मंजुरी देणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**नगरविकास विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक-अमपा-२०१८/प्र.क्र.७३/नवि-२६**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २९ ऑक्टोबर, २०१८

**वाचा :-**

१) शासन निर्णय, नियोजन विभाग, क्रमांक-तीक्षेवि-२०१५/प्र.क्र.०६/का-१४४४ दि.०४ जून,२०१५
२) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हास्तरीय समिती, अमरावती यांचे पत्र क्रमांक- कक्ष-८/ वि.लि./संदर्भ/कावि-७२७/२०१८ दिनांक ३०/०७/२०१८.
३) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हास्तरीय समिती, अमरावती यांचे पत्र क्रमांक-जिनिस/कार्या-३/ संस/स्मारके/१५२८/२०१८ दिनांक १३/०८/२०१८
४) मा.मुख्य सचिव महोदय यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २३/१०/२०१८ रोजी संपन्न झालेल्या “उच्च स्तरीय समितीच्या” बैठकीचे इतिवृत्त
५) मा.मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २९/१०/२०१८ रोजी संपन्न झालेल्या “शिखर समितीच्या” बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भाधीन क्र.०१ येथील नियोजन विभाग, शा.नि. दिनांक ०४ जून, २०१५ अन्वये राज्यातील तीर्थक्षेत्र, पर्यटनस्थळ, परिसर विकास आराखडा अंतिम करणे व त्याची अंमलबजावणीसाठी धोरण/ मार्गदर्शक सूचना प्रसारित केलेल्या आहेत. या शासन निर्णयानुसार, जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली “जिल्हास्तरीय कार्यकारी समिती”, मा.पालकमंत्री यांचे अध्यक्षतेखाली “जिल्हास्तरीय समिती”, मा.मुख्य सचिव महोदय यांच्या अध्यक्षतेखाली “उच्चाधिकार समिती” आणि मा.मुख्यमंत्री महोदय यांच्या अध्यक्षतेखाली “शिखर समिती” अशा समित्या नियुक्त करण्यात आलेल्या आहेत.

तद्नुसार, जिल्हाधिकारी अमरावती यांनी उपरोक्त नमूद शासन निर्णयातील कार्यपध्दतीनुसार जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील समितीने आणि मा.पालकमंत्री महोदय यांच्या अध्यक्षतेखालील समितीने अनुक्रमे दिनांक ०८/०८/२०१८ रोजी आणि दिनांक १०/०८/२०१८ रोजीच्या बैठकीत, “अमरावती जिल्ह्यातील मौजे वडाळी, ता.अमरावती येथे दिवंगत नेते श्री.रा.सु.गवई यांचे स्मारकाच्या बांधकामाचे (टप्पा-१) रु.२४.९९ कोटी किंमतीचे अंदाजपत्रक उपरोक्त संदर्भाधीन क्र.०२ व ०३ येथील प्रस्तावान्वये प्रशासकीय मान्यतेकरिता सादर केले होते.

त्यावर मा.मुख्य सचिव महोदय यांच्या अध्यक्षतेखालील “उच्च स्तरीय समितीने” दिनांक २३/१०/२०१८ च्या बैठकीत झालेल्या निर्णयानुसार, रु.२०.०३ कोटीच्या मर्यादेतील आराखडा कांही अटी व शर्तीसह मा.मुख्यमंत्री महोदय यांच्या अध्यक्षतेखालील “शिखर समितीकडे” प्रशासकीय मंजुरीकरिता शिफारस केलेली आहे.

तद्नुसार प्रस्तुत आराखड्यावर मा.मुख्यमंत्री महोदय यांच्या अध्यक्षतेखालील “शिखर समितीच्या” दिनांक २९/१०/२०१८ रोजी झालेल्या बैठकीच्या संदर्भाधीन क्र.०५ येथील इतिवृत्तानुसार रु.२०.०३ कोटीच्या विकास आराखड्यास नियोजन विभागाकडील उक्त नमूद क्रमांक-०१ येथील

शासन निर्णयान्वये नमूद करण्यात आलेल्या कार्यपध्दतीस अनुलक्षून प्रशासकीय मान्यता देण्याची कार्यवाही शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार खालीलप्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

दिवंगत नेते रा.सु.गवई यांच्या अमरावती येथील स्मारकाच्या खालील तक्त्यात नमूद एकूण रु.२०.३० कोटीच्या टप्पा-०१ मधील कामाच्या विकास आराखड्यास या शासन निर्णयाद्वारे तक्त्याखाली नमूद अटी व शर्तीवर प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अ) आराखड्यातील विकासकामांची (PMC सह) यादी खालीलप्रमाणे :-**

| Recapitulation Sheet | | | |
|---|---|---|---|
| S.No. | Particulars | | Amount (Rs.in Cr) |
| A | Land & Road development | | |
| १ | १५m wide RCC Road | | १.२० |
| २ | ६m wide RCC Road | | ०.६१ |
| ३ | ४m wide paving block pathways | | ०.१५ |
| ४ | Landscape Area | | १.१२ |
| | | (A) | ३.०८ |
| B | Civil work | | |
| १ | Statue of Late Shri. R. S. Gawai | | १.०० |
| | Area around statue | | ०.३७ |
| २ | Memorial gallery | | |
| | Ground floor | | १.९२ |
| | I Floor | | १.१९ |
| | terrace water proofing | | ०.१२ |
| ३ | २०० capacity Auditorium, conference, Cafeteria | | |
| | Ground Floor | | २.२४ |
| | I Floor | | १.१९ |
| | Terrace (water tank staircase, tower) | | ०.११ |
| | Terrace water proofing | | ०.१२ |
| ४ | Lift One (१० Passenger) | | ०.१३ |
| | | (B) | ८.३९ |
| C | Interior Work | | |
| | Memorial Gallery | | |
| | Ground Floor | | ०.९१ |
| | I floor | | ०.६१ |
| | २०० C Auditorium, Conference, Restaurant Ground& I Floor | | |
| | Ground Floor | | १.१२ |
| | I Floor | | ०.४२ |
| | Auditorium | | ०.९५ |
| | | (C ) | ४.०१ |

| | | | |
|---|---|---|---|
| D | Compound Wall | | ०.९८ |
| | Entry/Exit Complex | | ०.२० |
| | | (D) | १.१८ |
| Total | | (A+B+C+D) | १६.६६ |
| E | Others | | |
| | Internal Electrification | | ०.९२ |
| | External electrification | | ०.४० |
| | External water@ ८% | | ०.६७ |
| | Fire extinguisher arrangement | | ०.२० |
| | AC arrangement | | ०.३५ |
| | Green Building | | ०.२५ |
| | | (E ) | २.७९ |
| | | (A+B+C+D+E) | १९.४५ |
| | PMC Charges @ ३% | | ०.५८ |
| Grand Total | | | २०.०३ |

**ब) अटी व शर्ती :-**

१. सदर निर्णयाद्वारे सुधारित अंदाजपत्रकीय किंमतीतून आकस्मिक खर्च २%, जीएसटी १२%, वगळण्यात येत आहे. प्रकल्प सल्लागार फी ४% वरुन ३% इतकी करण्यात येत असून, ती PMC म्हणून निश्चीत करण्यात येत आहे.

२. या प्रकल्पासाठी सल्लागार फी धरुन या प्रकल्पावर होणारा खर्च रु.२०.०३ कोटीच्या मर्यादेत ठेवण्यात यावा आणि याच खर्चाच्या मर्यादेत सोलर पॅनेल लावण्याचेही काम पूर्ण करावे.

३. या प्रकल्पासाठी नगरविकास विभागाने चालू आर्थिक वर्षात “विशेष बाब” म्हणून रु.२.५० कोटी इतका निधी उपलब्ध करुन दिला आहे. तथापि, या प्रकल्पासाठीचा संपूर्ण नियतव्यय पुढील आर्थिक वर्षात अतिरिक्त नियतव्ययातून उपलब्ध करुन देण्याबाबत नियोजन विभागाने कार्यवाही करावी.

४. प्रस्तुत प्रकल्प राबविण्यापूर्वी सदरहू आराखड्यातील प्रत्येक कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकांना जिल्हाधिकारी, अमरावती यांनी सक्षम अधिका-यांची तांत्रिक मान्यता घेण्यात आल्याची खात्री करावी.

५. प्रस्तुत प्रकल्प राबविण्यापूर्वी तो ज्या जमीनीवर राबविण्यात येणार आहे, त्या जागेसंदर्भात सर्व संबंधितांकडून आवश्यक ते ना-हरकत घेणे आवश्यक राहील.

६. प्रस्तुत प्रकल्प राबविण्यापूर्वी आवश्यक त्या सक्षम प्राधिकरणाकडून पर्यावरणीदृष्ट्या ना-हरकत घेण्यात यावे.

७. जिल्हाधिकारी अमरावती यांनी, स्मारकाचे प्रत्यक्ष काम सुरु होण्यापूर्वी श्री.रा.सु.गवई स्मारक सार्वजनिक न्यासाची स्थापना करावी.

८. जिल्हाधिकारी अमरावती यांनी सदर संस्थेकडे स्मारकाच्या संपुर्ण (ऑडीटोरियम वगळता) देखभालीची जबाबदारी सोपविण्याबाबत कार्यवाही करावी.

९. या प्रकल्पातील ऑडीटोरियमचे बांधकाम झाल्यावर त्याची देखभाल व दुरुस्ती संत गाडगेबाबा अमरावती विद्यापीठामार्फत करण्यात यावी.

१०.सदर स्मारकासाठी उपलब्ध करुन देण्यात आलेल्या जागेचा व्यवस्थितरित्या उपयोग करण्यात यावा. सदर जागा संत गाडगेबाबा अमरावती विद्यापीठ, अमरावती यांच्या मिळकतीशी संलग्न असल्याने विद्यापीठाच्या दैनदिन कामकाजात बांधकामाचा अडथळा होऊ नये, याची दक्षता घेण्यात यावी.

११.आराखड्याची अंमलबजावणी करतांना शिखर समितीच्या मान्यतेशिवाय मंजूर आराखड्या व्यतिरिक्त कोणतेही नवीन काम समाविष्ट करता येणार नाही.

१२.या प्रकल्पासाठी उपलब्ध करुन देण्यात येणा-या शासकीय निधीच्या खर्चाबाबत वित्त विभाग व नियोजन विभागाने वेळोवेळी शासनपरिपत्रकान्वये / शासन निर्णयान्वये दिलेल्या सूचनांची/निर्देशांची जिल्हाधिकारी अमरावती यांनी काटेकोर अंमलबजावणी करावी.

१३.या प्रकल्पासाठी होणा-या शासकीय खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे विहीत कालमर्यादेत शासनास सादर करण्यात यावीत.

०२. प्रस्तुत प्रकल्पासाठी अतिरिक्त नियतव्ययातून निधी उपलब्ध करुन घेण्याबाबत आणि प्रस्तुत प्रकल्प राबविण्यात येत असताना, उक्त नमूद अटी व शर्तीचे पालन होत असल्याची खात्री झाल्यानंतर, या प्रकरणी निधी वितरीत करण्याबाबत कार्यासन नवि-२०/नवि-१६ ने पुढील कार्यवाही करावी.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०२९१६०६४७९८२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Yoge Shashikant Narhari

Digitally signed by Yoge Shashikant Narhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=88b7261ec236df5e51055c4e56e97c2ea6823e6595d110ff293acdf173898c9d, cn=Yoge Shashikant Narhari
Date: 2018.10.29 17:12:46 +05'30'

**(शशिकांत योगे)**
**कक्ष अधिकारी, नगरविकास विभाग**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२. मा.मंत्री, वित्त व नियोजन यांचे खाजगी सचिव.
३. मा.पालक मंत्री, अमरावती यांचे खाजगी सचिव.
४. मा.राज्यमंत्री, वित्त व नियोजन यांचे खाजगी सचिव.
५. मा.राज्यमंत्री, नगरविकास यांचे खाजगी सचिव.
६. अमरावती जिल्ह्यातील संबंधित संसद सदस्य, विधानसभा/ विधानपरिषद सदस्य.
७. मा.अध्यक्ष, अमरावती जिल्हा परिषद, अमरावती.
८. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग/नियोजन विभाग/सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव (नवि-१), सचिव (नवि-२), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

१२. विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, नागपूर.
१३. जिल्हाधिकारी अमरावती, अमरावती.
१४. पोलीस महानिरीक्षक/ पोलीस अधिक्षक अमरावती.
१५. आयुक्त, अमरावती महानगरपालिका, अमरावती.
१६. उप सचिव/सह सचिव (कार्यासन नवि-२०/नवि-१६), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. निवड नस्ती, कार्यासन नवि-२६, नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.